**अर्थसंकल्पीय अनुदान २०१६-१७ महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी ग्रामीण दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेअंतर्गत अनुदाने मंजूर / मुक्त करणेबाबत. (लेखाशीर्ष २२१५ ९५९५)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** ग्रादयो-३५१६/प्र. क्र.३६/पापु-१६
७ वा मजला , गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक रोड, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई-४०० ००१.
तारीख: ०८ नोव्हेंबर, २०१६

वाचा :-

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-११११/प्र.क्र.१५६/पापु-०७, दि. १८ नोव्हेंबर, २०११.
२) **शासन शुध्दीपत्रक क्रमांकः** ग्रापाधो-११११/प्र.क्र.१५६/पापु-०७, दि. ३०जानेवारी, २०१२.
३) **शासन शुध्दीपत्रक क्रमांकः** ग्रापाधो-११११/प्र.क्र.१५६/पापु-०७, दि. ८ फेब्रुवारी, २०१२.
४) **शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.** अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६

प्रस्तावना :-

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी विधीमंडाळाला सादर करण्यात आलेला महाराष्ट्र विनियोजन विधेयक २०१६ (महाराष्ट्र विनियोजन (लेखानदान ) अधिनियम, २०१६ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) विधिमंडळाने मंजूर केला आहे, आणि तो सन २०१६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. १३ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग ४ दि. १६ एप्रिल, २०१६ यामध्ये प्रसिध्द करण्यात आला आहे.

२. संदर्भाधीन क्र. १, २ व ३ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवानिमित्त, ग्रामीण दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजना राज्यामध्ये लागू करण्यात आलेली आहे. या योजनेअंर्गत राज्याच्या ग्रामीण भागातील अनुसूचित जातीच्या त्याचप्रमाणे नवबौध्द घटकांच्या वस्त्यांमध्ये वैयक्तिक शौचालये त्याचप्रमाणे खाजगी नळ जोडण्या देणे अभिप्रेत आहे.

३. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी या योजनेसाठी विशेष घटक योजनेखाली, लेखाशिर्ष २२१५ ९५९५ अंतर्गत एकूण रु.१५००.०० लक्ष निधीची तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली असून त्यापैकी रु. १२००.०० लक्ष अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आली आहे. सदर निधी संबंधित यंत्रणांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र सुवर्ण महोत्सवी ग्रामीण दलित वस्ती पाणी पुरवठा व स्वच्छता योजनेअंतर्गत ग्रामीण भागात घ्यावयाच्या उपाययोजनांसाठी, जिल्हा परिषदांचे मुख्य

कार्यकारी अधिकारी यांना सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-३ मध्ये दर्शविलेल्या वाटपानुसार एकूण रुपये ४,६९,३०,२०० (रुपये चार कोटी, एकोणसत्तर लक्ष, तीस हजार, दोनशे फक्त) इतकी तरतूद मंजूर व मुक्त करण्यात येत असून अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर आहरणासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सदर अनुदान संबंधित यंत्रणांना पुढील अटींवर रोख मुक्त करण्यात येत आहे :-

अ) हे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी जिल्हा परिषदेने खर्च करावे.

आ) ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे उपलब्ध होणारा निधी जिल्हा परिषदेकडून ज्या नियमित खात्यांमध्ये जमा करण्यात येतो, त्याच खात्यांमध्येच हा निधी जमा करण्यात यावा.

इ) या योजनेअंतर्गत घेतलेल्या कामांचा भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांचेकडे दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत न चूकता सादर करावा.

ई) शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालवा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील कार्यासन क्र. पापु-०५, पापु-१६, व पापु-२० ला सादर करावेत.

उ) वरील मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनाकडे विहित प्रपत्रात सादर करण्यात यावीत.

ऊ) या योजनेअंतर्गत सन २०१४-१५ या वर्षाकरीता किंवा त्यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम अखर्चीत असल्यास सदर निधी शासनास समर्पित करण्यात यावा.

३. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (२३) अनुसूचित जाती नवबौध्द कुटुंबीयांना वैयक्तिक पाणी पुरवठा व नळ जोडणीसाठी सहाय्यक अनुदान (२२१५ ९५९५), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखली खर्ची घालावा व या आर्थिक वर्षासाठी त्याखालील मंजूर तरतूदीतून भागवावा.

४. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २८४०/विघयो, दि. ३०/०८/२०१६ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेने व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६ मधील परिच्छेद

७ ते १८ मधील तसेच परिशिष्टातील अ.क्र. ९ मधील तपासणीसुचीतील अ.क्र. १ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११०८१५०३१७८४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2016.11.10 16:46:49 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव , महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहयक.
४. विभागीय आयुक्त , सर्व.
५. सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्राणा, पुणे.
७. संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२-मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा)
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२-मुंबई/नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
१०. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/ नागपूर
११. उप मुख्य लेखा परीक्षक , स्थानिक निधी लेखा, नाशिक ,पुणे, औरंगाबाद
१२. उपायुक्त विकास, सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय
१३. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव , जिल्हा नियोजन समिती, (सर्व)
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१६. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, (WSSO), बेलापूर , नवी मुंबई
१७. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पा.व स्व.) जिल्हा पिरषद, (सर्व)

१८. उप मुख्य लेखा परिक्षक , स्थानिक निधी लेखा, जिल्हा परिषद, (सर्व )

१९. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा, (सर्व)

२०. मुख्य लेखा व वित्त अधिकारी , जिल्हा परिषद, (सर्व)

२१. नियोजन विभाग, (कार्यासन १४४३) मंत्रालय, मुंबई.

२२. वित्त विभाग, (व्यय) मंत्रालय, मुंबई.

२३. कार्यासन क्र. पापु-०४,पापु-०८ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छचा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२४. निवड नस्ती, कार्यासन पापु-१६.

**विवरणपत्र-अ**

शासन निर्णय क्र. ग्रादयो-३५१६/प्र.क्र. ३६/पापु-१६, दि. ८ नोव्हेंबर, २०१६ सोबतचे विवरणपत्र-अ.

| अ.क्र. | जिल्हा परिषद | सन २०१६-१७ वर्षासाठी लेखाशीर्ष २२१५ ९५९५ अंतर्गत वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | जळगाव | ३,००,००,००० |
| २ | गोंदिया | १,५३,००,००० |
| ३ | वर्धा | १६,३०,२०० |
| **एकूण** | | ४,६९,३०,२०० |
| **अक्षरी रुपये** | | **चार कोटी एकोणसत्तर लक्ष तीस हजार दोनशे** |

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2016.11.10 16:47:41 +05'30'

**(चेतन निकम)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन